**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वन हक्काच्या अंमलबजावणीसाठी ठाणे जिल्हयातील मुरबाड व शहापूर या दोन तालुक्यामध्ये एक जिल्हा व्यवस्थापक व दोन तालुका व्यवस्थापक यांच्या नेमणुका करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :राज्यपा २०१५/प्र.क्र. ५४/ का-१६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : ३ जून,२०१५

**वाचा** :- १.शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : आरएजे -१०२२/मुंमस/प्र.क्र. १७/२०११/ २०अ/, दिनांक ३१.१.२०१२
२. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : राज्यपा २०१५/प्र.क्र. ३६/का-१६, दिनांक ३१ मार्च,२०१५
३. जिल्हाधिकारी व जिल्हादंडाधिकारी कार्यालय, ठाणे, यांचे पत्र क्र. मशा/कार्या-४/टेनन्सी/ मानधन कर्मचारी/सी.आर.क्र.०८/२०१५, दिनांक २.६.२०१५

**प्रस्तावना** :

सामुहिक वनहक्काच्या अमंलबजावणीसाठी पथदर्शी प्रकल्प समितीने प्रायोगिक तत्वावर यवतमाळ, पालघर, चंद्रपूर, नाशिक आणि रायगड या ५ जिल्हांकरीता ५ व्यवस्थापक आणि २० तालुक्यासाठी २० व्यवस्थापक यांच्या नेमणुकीबाबत आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- राज्यपा २०१५/प्र.क्र.३६/का-१६, दिनांक ३१ मार्च, २०१५ अन्वये मंजूरी दिलेली आहे. त्याच धर्तीवर ठाणे जिल्हयासाठी जिल्हा व्यवस्थापक आणि मुरबाड व शहापूर या दोन तालुक्यासाठी व्यवस्थापक नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांक : राज्यपा २०१५/प्र.क्र. ३६/का-१६, दिनांक ३१ मार्च,२०१५ घेतलेल्या निर्णयानुसार ५ जिल्हांकरीता व त्यातील २० तालुक्यासाठी व्यवस्थापक नेमणुकीबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहे. त्याच धर्तीवर ठाणे जिल्हयातील मुरबाड आणि शहापूर दोन तालुक्यांमध्ये सामुहिक वनहक्काच्या अंमलबजावणीसाठी एक जिल्हा व्यवस्थापक व दोन तालुका व्यवस्थापक यांची मानधन तत्वावर कंत्राटी पध्दतीने नेमणूक करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर योजनेचे स्वरुप व निकष हे संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयानुसार असतील.

**एकूण आर्थिक भार-** (प्रकल्पाचा एकुण खर्च)

१) **जिल्हा व्यवस्थापक-** (एका महिन्याला २० प्रकरणे याप्रमाणे २ तालुक्यातील ४० प्रकरणे या प्रमाणे ६ महिन्यात २४० प्रकरणे)

मानधन - २०००० x १ x ६ (महिने) = रु. १,२०,०००/-

प्रोत्साहन भत्ता ६२.५० x २४० = १५०००/-

२) **तालुका व्यवस्थापक-** ( एका महिन्याला २० प्रकरणे याप्रमाणे २ तालुक्यातील ४० प्रकरणे या प्रमाणे ६ महिन्यात २४० प्रकरणे )
मानधन १५००० x २ x ६ ( महिने ) = रु. १,८०,०००/-
प्रोत्साहन भत्ता १५०x २४० = ३६,०००/-

**एकूण रु. ३,५१,०००/- ( अक्षरी रुपये तीन लाख एक्कावन्न हजार )एवढया खर्चास मान्यता देण्यात येत आहे.**

सदर प्रकल्पाचे सनियंत्रण आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडून करण्यात येणार असून सदर प्रकल्पाची अंमलबजावणी वनहक्क अंमलबजावणी व्यवस्थापक यांचेकडून जिल्हास्तरावरुन मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे नियंत्रणेत आणि वनहक्क अंमलबजावणी व्यवस्थापक यांचेकडून तालुका स्तरावरुन गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांचे नियंत्रणेत करण्यात येणार आहे. याकरीता आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे नियंत्रण अधिकारी म्हणून राहतील व सहाय्यक प्रकल्प अधिकारी, आयुक्त आदिवासी विकास कार्यालय , नाशिक हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील.

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्काची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २०१२ च्या अंमल बजावणीबाबत वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक म्हणून मानधन तत्वावर कंत्राटी पध्दतीने नेमणुकीच्या योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्र.टि-५, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मगासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२, अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) (५३)आदिवासी कक्षामार्फत राज्यातील अनुसूचित क्षेत्रामध्ये पथदर्शी प्रकल्पाची अंमलबजावणी ( २२२५-डी ३६९ )-३१ सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षाकरीता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल,२०१५ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटीची पुर्तता झाली असल्याचे प्रमाणित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०६०३१७४०३९३४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.06.04 12:35:13 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. महालेखापाल लेखापरिक्षा , ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१, मुंबई
४. महालेखापाल लेखापरिक्षा , ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर,
५. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, (वने ) मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान मुख्य वन संरक्षक, ( वनबल प्रमुख ) महाराष्ट्र राज्य, नागपूर/मुंबई/ठाणे
१०. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
११. जिल्हाधिकारी, ठाणे
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
१३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
१५. सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, शहापूर, मूरबाड, जिल्हा-ठाणे.
१७. कक्ष अधिकारी, (का-६ ) अर्थसंकल्प शाखा, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती कार्यासन-१६